दै. महाराष्ट्र टाईम्स, पुणे
सोमवार दि. २८ मे २०१८





# युरोपीय आरमार

## परंपरा आरमाराची

भाग ४

अनिकेत यादव

मित्रांनो, मागच्या भागात आपण आपली नौदल परंपरा पाहिली. कालांतराने सिंधूबंदीसारख्या अनिष्ट रुढीपरंपरा, चालीरीती, तसेच नवीन गोष्टी शिकण्याचा अभाव यामुळे आपली नाविक परंपरा संपत गेली आणि आपसूकच आपला संपूर्ण समुद्री व्यापार नव्याने आलेल्या पोर्तुगीज, इंग्रज, डच, फ्रेंच यांच्या हाती गेला. मसाल्याचे पदार्थ आणि कलाकुसरीच्या वस्तूंना परदेशात प्रचंड मागणी होती. भारतीय वस्तूंनी भरलेले जहाज आले, की त्यातील वस्तू पटापट विकल्या जात.

भारतात मात्र तेव्हा परदेशी वस्तूंना फारशी मागणी नसल्यामुळे भारतातील संपत्ती ही भारतातच राहत होती. एक थोर इतिहासतज्ज्ञ म्हणतात की, सर्व नद्यांचे पाणी जसे समुद्रात साठते, त्याप्रमाणे इतर देशांतला पैसा हा हिंदुस्थानात येऊन साठत असे. कदाचित त्यामुळेच भारतात सोन्याचा धूर निघत होता, असे म्हटले जायचे.

ही सगळी प्रसिद्धी ऐकून युरोपीयांची भारतात जायची चढाओढ असायची. भारतीय लोक ग्रह-ताऱ्यांच्या स्थितीवरून वातावरण कसे राहील, हवा कशी असेल याचा अभ्यास करीत असल्याचे अनेक परदेशी व्यापाऱ्यांनी पाहिल्यामुळेच युरोपीयन आपल्याकडे आकृष्ट झाले.

एप्रिल १४९८ मध्ये पोर्तुगीज अधिकारी वास्को-द-गामा केरळमधील कालिकत बंदरात आला. सुरुवातीला चांगला व्यापार केल्यानंतर मात्र सत्तेच्या हव्यासापोटी कालिकतचा राजा सामुद्रीराजा (झामोरीन) आणि तेथील प्रजेवर हल्ले करून त्याने त्यांचे नुकसान केले. समुद्री आरमारामुळे प्रबळ असल्याने गामाने समुद्रातून या बंदरावर तोफांचा मारा केला. स्थानिक नागरिकांचे हातपाय कापण्यात आले. झामोरीनच्या वकिलाचे कान कापून त्याला कुत्र्याचे कान लावून अत्याचार करण्यात आले. प्रबळ आरमार नसल्याने कालिकतच्या राजाला



काहीही करता आले नाही. पुढे इसवी सन १५१० मध्ये पोर्तुगीज अधिकारी अल्फान्सो अल्बुकर्क याने गोवा काबीज केले. हा क्रूर, मात्र उत्तम प्रशासक होता. त्याच्यामुळे पोर्तुगीजांचे भारतात बस्तान बसू शकले. मात्र, या कालावधीत गोव्यातल्या प्रजेवर खूप अत्याचार झाले. पोर्तुगीज, इंग्रज, डच, फ्रेंच, युरोपीयन हे प्रत्येक युद्ध निर्धाराने लढले. त्यांची आपला देश आणि धर्माबद्दलची आस्था, निष्ठा, दूरदृष्टी यामुळे त्यांना विजय मिळत गेला. मुघलकाळात युरोपातल्या अनेक व्यापारी कंपन्या भारतात येऊ लागल्या. मुस्लिम यात्रेकरूंना मक्केची यात्रा सुरक्षितपणे करता यावी, एवढ्यापुरतेच मुघलांचे समुद्राकडे लक्ष होते. मोगल आणि इतर शाह्यांना जमिनीवर सत्ता हस्तगत करायची असल्यामुळे या परदेशी कंपन्यांच्या चळवळींकडे त्यांचे दुर्लक्ष होऊ लागले. त्याचा फायदा युरोपियनांनी घेतला आणि संपूर्ण हिंदी महासागर त्यांच्या मालकीचा झाला. समुद्रावर कुणीही जहाज बाहेर काढायचे म्हटले की, या युरोपियनांचे परवाने घेणे सक्तीचे करण्यात आले आणि आपले सार्वभौमत्व संपुष्टात आले.

---

ोती
ारळ
जांभळं
तसंच होतं
मतच आहे!
य जातो!'
जसाच्या तसाही
. पण किती खोड्या
विता आहे की टिंबावरची...
ल्या, 'गती, अशी कपाळावरची
हणाली, 'ताई, ती टिंबाचा जागा
वर सगळे गतीच्या गमती बघत
बसले...

राचा
मधोमध
द फोल्ड
म्हणजे एक
बंद होईल. दोन्ही
ा बंद चिकटवून
आणि त्यानंतर बंद
ल्या समोरची बाजू
किंचित बाजूला दुमडून
आणि घट्ट चिकटवून टाका.
वी बाजू दोन्ही बाजूंनी थोडी
दुमडून घेऊन बंद करावयात. यू
वरही कागदी पिशव्या करण्याबाबत
डओ उपलब्ध आहेत. तुम्हाला या
ल्या हलके सामान आणण्यासाठी किंवा
कचरा टाकण्यासाठी करू शकता!